**गोंदिया जिल्ह्याचे जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०१४-१५ अंतर्गत नाविन्यूपर्ण योजनेंतर्गत "मा.मा.तलाव कुडवा सुर्यटोला सौंदर्यीकरण" याकरीता वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करण्यास एक वेळची विशेष बाब म्हणून शेवटची मान्यता देणेबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डिएपी-१०१७/प्र.क्र.१७९/का.१४८१.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २४ ऑगस्ट, २०१८.

<u>वाचा :</u> १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक : संकीर्ण-१०.०२/प्र.क्र.१२८/अर्थोपाय, दिनांक : ०६ जून, २००८.
२) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक : संकीर्ण- १०.१५/प्र.क्र.१८/अर्थोपाय, दिनांक : २५ ऑगस्ट, २०१५.
३) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक : संकीर्ण-१०.१७/प्र.क्र.६४/अर्थोपाय, दिनांक २१ सप्टेंबर, २०१७.
४) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : डिएपी-१०१७/प्र.क्र.१७९/का.१४८१, दिनांक ०३.०३.२०१८ रोजीचा शासन निर्णय
५) जिल्हाधिकारी, गोंदिया यांचे पत्र क्रमांक : जिनिस/संस-२/जिवायो/अखर्चित/ १७-१८/२५.०४.२०१८, दिनांक : ०१.०८.२०१७.

**<u>प्रस्तावना</u> :**

जिल्हाधिकारी, गोंदिया यांच्या संदर्भीय पत्रान्वये गोंदिया जिल्ह्याचे जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०१४-१५ अंतर्गत नाविन्यपूर्ण योजनेतून "मा.मा. तलाव कुडवा सुर्यटोला सौंदर्यीकरणासाठी वितरीत करण्यात आलेला निधी सन २०१७-१८ मध्ये खर्च करण्याबाबत विनंती करण्यात आली होती.

२. वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक १, २ व ३ नुसार अखर्चित निधीबाबत शासनाचे धोरण लक्षात घेता, नाविन्यपूर्ण योजनेखाली "मा.मा. तलाव कुडवा सुर्यटोला सौंदर्यीकरणासाठी गोंदिया जिल्ह्यास जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०१४-१५ मध्ये वितरीत करण्यात आलेल्या रु.८९,६९,५३०/- लक्ष निधी ३१ मार्च, २०१८ मध्ये खर्च करण्यास संदर्भाधीन क्र-४ अन्वये परवानगी देण्यात आली होती. सदरहू कामाची निविदा प्रक्रीया अंतिम झाली नसल्याने, अखर्चित निधी ३१.०३.२०१८ पर्यंत खर्च करणे शक्य झालेले नाही. त्यामुळे सदर निधी दिनांक ३१.०३.२०१९ पर्यंत खर्च करण्यास परवानगी मिळण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय :</u>**

गोंदिया जिल्ह्याच्या जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०१४-१५ अंतर्गत नाविन्यपूर्ण योजनेतून मा.मा. तलाव कुडवा सुर्यटोला सौंदर्यीकरणासाठी वितरीत केलेला रु.८९,६९,५३०/- लक्ष इतका अखर्चित निधी अपवादात्मक बाब म्हणून ३१ मार्च, २०१८ पर्यंत खर्च करण्यास दिनांक ०३.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये "एक वेळची विशेष बाब" म्हणून मान्यता देण्यात आली होती. तथापि, गोंदिया जिल्ह्याच्या जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०१४-१५ अंतर्गत नाविन्यपूर्ण योजनेअंतर्गत मा.मा.तलाव कुडवा (सुर्यटोला) गट क्र.३३० चे सौंदर्यीकरण कामाच्या निविदेस जिल्हा परिषद, गोंदिया यांच्या सर्वसाधारण सभेकडून निविदा स्विकृती करण्याबाबत ठराव क्र.३/५ अन्वये दिनांक ०८.०६.२०१८ रोजी मंजूरी प्रदान करण्यात आली आहे. ही बाब विचारात घेता, सदरहू कामाकरीता अखर्चित निधी रु.८९,६९,५३०/- (अक्षरी एकोणनव्वद लाख एकोणसत्तर हजार पाचशे तीस फक्त) दिनांक ३१.०३.२०१९ पर्यंत खर्च करण्यास **<u>एक विशेष बाब</u>** म्हणून **<u>शेवटची मुदतवाढ</u>** देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या <u>www.maharashtra.gov.in</u> या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक - २०१८०८२४१७०४४६५६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijesing Fattesing Vasave

Digitally signed by Vijesing Fattesing Vasave
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a7de9682e22326e67a2c7e4125e658721c298e35048adffdff595b37a1b194aa, cn=Vijesing Fattesing Vasave
Date: 2018.08.27 13:01:11 +05'30'

**( वि.फ.वसावे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, गोंदिया
२) विभागीय आयुक्त, नागपूर
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया
४) जिल्हा नियोजन अधिकारी, गोंदिया
५) जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
८) निवड नस्ती, कार्या.१४८१.